१४ वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार कार्यरत न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेंतर्गत सांगली जिल्ह्यातील विटा येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती / नविनीकरणास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**विधि व न्याय विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : संकिर्ण ०८१६/५८५/प्र.क्र.९५-अ/कार्या.११**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ सप्टेंबर, २०१७

__वाचा__ : १. शासन निर्णय, विधि व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०७/कार्या.९, दि.१०/११/२०१६
२. शासन निर्णय, विधी व न्याय विभाग क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/नऊ, दि.१२/६/२०१७.
३. प्रबंधक (निरिक्षणे २) यांचे पत्र क्र. क्र.B(W)६०४९/२०१०/१९२३/१७१७०, दि.२१/७/२०१६ व क्र.B(W) ६०४९/२०१०/८६८/१०५०३/२०१७ दि.११/४/२०१७
४. जिल्हा न्यायालय, सांगली यांचे पत्र क्र.४१९९/२०१६ दि.७/७/२०१६, व क्र.३७४/२०१७, दि.१३/१/२०१७

__**प्रस्तावना :**__

१४ व्या केंद्रीय वित्त आयोगाने शिफारस केलेल्या “न्याय व्यवस्थेचे सक्षमीकरण” (Strengthening the Justice) या प्रयोजनासाठी सन २०१५-२०१६ ते २०१९-२०२० या ५ वर्षाच्या कालावधीकरीता महाराष्ट्र राज्यासाठी रुपये १०१४ कोटी इतक्या निधीची शिफारस केली आहे. १४ व्या वित्त आयोगांतर्गत कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण या घटकासाठी ५ वर्षाच्या कालावधीकरीता रु.२२८ कोटी इतक्या निधीची तरतूद करण्यात आली आहे. १४ व्या वित्त आयोगाने केलेल्या शिफारशींची कार्यक्षम अंमलबजावणी करण्यासाठी दि.९/३/२०१६ रोजी उच्चस्तरीय संनियंत्रण समिती गठीत करण्यात आलेली आहे. या बैठकीमध्ये मा.उच्च न्यायालयाकडून प्राप्त झालेल्या कृती आराखड्यास तत्वत: मान्यता देण्यात आली आहे. तसेच वित्त विभागाच्या मान्यतेने संदर्भाधीन दि.१२/६/२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये १४ व्या वित्त आयोगांतर्गत न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्तीच्या कामांना रुपये ५० लक्ष मर्यादेपर्यंत प्रशासकीय मान्यता देण्याचे अधिकार प्रशासकीय विभागांना प्रदान करण्यात आले आहेत.

या अनुषंगाने जिल्हा व सत्र न्यायालय, सांगली यांच्या अधिपत्याखालील विटा येथील न्यायालयाच्या दुरुस्ती /नविनीकरणाचे सन २०१५-२०१६ व सन २०१६-२०१७ च्या दरसूचीवरील प्रस्ताव उपरोक्त संदर्भ क्र.३ येथे नमूद पत्रान्वये मा.उच्च न्यायालय, मुंबई यांचेकडून शासनास प्राप्त झाले आहेत. सदर अंदाजपत्रके संबंधित उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, सांगली यांनी तयार केली असून संबंधित कार्यकारी अभियंता यांनी साक्षांकित केली आहेत. तसेच सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई यांनी सदर अंदाजपत्रक तपासून प्रशासकीय मान्यतेस सहमती दर्शविली आहे. त्यानुसार खालीलप्रमाणे नमूद केलेल्या कामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

१४ व्या वित्त आयोगाच्या शिफारशीनुसार राज्यातील न्यायालयाचे नुतनीकरण या योजनेअंतर्गत जिल्हा न्यायालय, सांगली यांच्या अधिपत्याखालील विटा येथील न्यायालयीन इमारतीच्या दुरुस्ती /नुतनिकरणासाठी येणारा रु.४५,८७,४७८/- (अक्षरी रुपये पंचेचाळीस लाख सत्त्याऐंशी हजार चारशे अठ्ठ्यात्तर फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांगली यांच्या अधिपत्याखालील विटा येथील न्यायालयाच्या दुरुस्ती / नुतनीकरणाच्या कामाचा तपशिल खालीलप्रमाणे आहे.

**जिल्हा व सत्र न्यायालय, सांगली**

| अ.क्र. | न्यायालयीन इमारत | १४ व्या वित्त आयोगांतर्गत प्रस्तावित कामे | सा.बां.विभागणे अंदाजपत्रकाची परिगणित मान्यता दिलेली किंमत (रुपयात) |
|---|---|---|---|
| १ | विटा | Construction of waiting rooms in civil Judge court Witness Box | ४३,०४,६०८/- |
| | | Waterproofing for court building | २,८२,८७०/- |
| **एकूण (रुपये)** | | | **४५,८७,४७८/-** |

जिल्हा व सत्र न्यायालय, सांगली यांच्या अधिपत्याखालील विटा येथील न्यायालयीन इमारतीच्या नविनीकरणासाठी येणारा खर्च "मागणी क्र.जे-१, २०१४ न्यायदान १०२- उच्च न्यायालये, (११) कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण,(११)(०१)कार्यरत न्यायालयाचे नविनीकरण (२०१४ ०५४८) या लेखाशीर्षाखाली सन २०१७-२०१८ या आर्थिक वर्षासाठी मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर कामाची निविदा मागविण्यापूर्वी उपरोक्त कामे मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या Dedicated Cell ने निश्चित केलेल्या १३ कामामधील असल्याची खातरजमा करण्याची तसेच सदर अंदाजपत्रके सक्षम अधिका-याकडून साक्षांकित करण्याची जबाबदारी प्रमुख जिल्हा व सत्र न्यायाधीश, सांगली यांची राहील. तसेच विहित कार्यपध्दतीचा अवलंब करुन ई-निविदा प्रक्रिया सार्वजनिक बांधकाम विभागाकडून राबविण्यात यावी व या प्रशासकीय मान्यतेच्या अनुषंगाने इतर अनुषंगिक कार्यवाही पूर्ण करावी.

हा शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौ.सं.क्र.३१२/इमा-२, दि.१७/१०/२०१६, अनौ.सं.क्र.४५०/इमा.२, दि. १५/६/२०१७ व त्या विभागाच्या सहमतीने तसेच शासन निर्णय, विधि व न्याय विभाग, क्र.चौविआ १२१६/प्र.क्र.१०/का.नऊ, दि.१२/६/२०१७ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०९०६१५३९३३१३१२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने.

Anita Dipak Ripote

Digitally signed by Anita Dipak Ripote
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law And Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra,
2.5.4.20=28bdb8b03e204307a26238ccccb76a2c1eaa9ed4838f450b88dfb9ca9793b4b5,
serialNumber=25e18795e96deb90b1428c41cb6c87bc90c3bb1f0ea059da3e0a07a3bc00c6c8, cn=Anita Dipak Ripote
Date: 2017.09.06 15:30:05 +05'30'

( अनिता रिपोटे )

कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. प्रबंधक (निरिक्षणे २), मा.उच्च न्यायालय, अपिल शाखा, मुंबई,
२. प्रमुख जिल्हा सत्र न्यायाधीश, सांगली
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता ), महाराष्ट्र मुंबई,
४. महालेखापाल ( लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
५. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली,
६. उप जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली,
७. वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई,
८. सार्वजनिक बांधकाम विभाग (इमा-२), मंत्रालय, मुंबई,
९. विधि व न्याय विभाग (का.९/२३), मंत्रालय, मुंबई,
१०.निवडनस्ती.